केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण योजनेंतर्गत सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना जुलै, २०२० ते ऑक्टोबर, २०२० या कालावधीतील वाढीव मोबदला रु.५७५६.८० लक्ष वितरीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पुरमा -३५२०/प्र.क्र.१५/२०२०/आरोग्य-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०२०

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२०.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. बैठक ०२१९/प्र.क्र.१६९/आरोग्य-७, दिनांक १७ जुलै, २०२०
३) सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआअ/जीआर नुसार /निधी वितरण/५५००८-०९/२०२०, दिनांक ०७ ऑक्टोबर, २०२०

प्रस्तावना :-

राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमांतर्गत राज्यात आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक कार्यरत आहेत. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना, निकष व दराप्रमाणे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी आराखडयात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना राष्ट्रीय आरोग्य अभियानात नेमून दिलेल्या एकूण ७८ सेवा केल्यास त्या सेवेस केंद्र शासनाने निर्धारित केल्याप्रमाणे प्रोत्साहनात्मक मोबदला दिला जातो. तथापि, राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमांतर्गत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक हया दोन्ही घटकांच्या भूमिका महत्वाच्या असल्यामुळे त्यांना दिल्या जाणाऱ्या मोबदल्यात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने दिनांक २५ जून, २०२० रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना दिनांक १ जुलै, २०२० पासून प्रत्येकी रु. २०००/- व ३०००/-

इतका वाढीव मोबदला देण्याचा निर्णय घेण्यात आला. तसेच त्याबाबतचा दिनांक १७ जुलै, २०२० रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना जुलै, २०२० ते मार्च, २०२० या कालावधीतील वाढीव मोबदला रु. १२९५२.८० लक्ष अदा करण्यास सन २०२० च्या पावसाळी अधिवेशनात विधीमंडळाने मंजुरी दिली आहे. त्यास अनुसरुन वित्त व नियोजन विभागाने जुलै, २०२० ते ऑक्टोबर, २०२० या कालावधीचे रु. ५७५६.८० लक्ष इतक्या अनुदान वितरणास मान्यता दिली आहे. सबब, सदर अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण वर्गवारीतून (General) सन २०२०-२१ मध्ये राज्य हिश्श्यापोटी रु. ५७०९०.६८ लक्ष तसेच सन २०२० च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे रु. १२९५२.८० लक्ष अशी एकूण रु. ७००४३.४८ इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. सदर तरतुदीतून आशा स्वयंसेविका व आशा गटप्रवर्तक यांना जुलै, २०२० ते ऑक्टोबर, २०२० या ४ महिन्याच्या कालावधीची रक्कम लेखाशिर्ष २२१०५२४६ मधून रु. ५७५६.८० लक्ष इतकी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२१ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतुद सन २०२०-२१ | ऑक्टोबर, २०२० पर्यंत वितरीत तरतूद | मागणी रक्कम (राज्य हिस्सा) |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | (रु.लाखात) |
| १ | आर-१ २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ८००- इतर खर्च; सर्वसाधारण योजना (०१) (१५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र पुरस्कृत योजना (४० टक्के राज्य हिस्सा) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर | २२१०५२४६ | ७००४३.४८ | ११५८५.९१ | ५७५६.८० |

४. वित्त विभागाच्या दिनांक १६ एप्रिल, २०२० च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १६ एप्रिल, २०२० च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १६ एप्रिल, २०२० च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

५. सदर अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३६५/२०२०/व्यय-१३ दि.१५ ऑक्टोबर, २०२० व नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ११५३/१४२३, दिनांक १३ ऑक्टोबर, २०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०३११४९५८९९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.11.03 13:02:11 +05'30'

**( ज. स. तडवी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थसंकल्प)/व्यय-१३, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२.निवडनस्ती ( आरोग्य -७) .